रास्तभाव दुकान/शिधावाटप दुकान व केरोसीन परवाना मंजूर करण्यासाठी नवीन दुकानासाठी जाहिरनामा प्रसिध्द करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः राभादु-२११७/प्र.क्र.१५७/नापु ३१.
मंत्रालय (विस्तार), मुंबई -४०००३२.
तारीख : ०१ ऑगस्ट, २०१७.

वाचा :- अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांकः राभादु- १७१६/प्र.क्र.२३९/नापु-३१, दि.०६ जुलै, २०१७.

**शासन परिपत्रक :-**

सार्वजनिक वितरण प्रणालीअतंर्गत वितरित करण्यात येणाऱ्या शिधावस्तू शिधापत्रिकाधारकांना सहजपणे उपलब्ध व्हाव्यात या उद्देशाने अस्तित्वात असलेली शिधावाटप दुकाने काही कारणास्तव रद्द झाल्यानंतर किंवा त्या क्षेत्रातील एकांकामध्ये वाढ झाल्यामुळे नवीन रास्तभाव/शिधावाटप दुकान मंजूर करण्यासाठी जाहिरनामा प्रसिध्द करणे व त्यानुषंगाने नवीन शिधावाटप दुकान मंजूर करणे यासाठी पुढीलप्रमाणे कालबध्द कार्यक्रम निश्चित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | कालबध्द कार्यक्रम दिनांकनिहाय |
|---|---|---|
| १ | नवीन रास्तभाव /शिधावाटप दुकाने व केरोसीन परवाने मंजूर करण्याकरीता जाहिरनामा काढणे व प्रसिध्द करणे. (स्थगनादेश नसल्यास) | दि.१० ऑगस्ट,२०१७ |
| २ | संस्थांना अर्ज करण्याकरीता मुदत (३० दिवस) | दि.१० सप्टेंबर,२०१७ पर्यंत |
| ३ | नवीन दुकानाकरिता प्राप्त झालेल्या, अर्जाची प्राथमिक तपासणी छाननी, जागेची तपासणी व इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करणे.(३० दिवस) | दि.१० ऑक्टोबर,२०१७ पर्यंत |
| ३ | नवीन दुकाने मंजूर करणे. (१५ दिवस) | दि.२५ ऑक्टोबर,२०१७ पर्यंत |

२. शासन निर्णय क्र.राभादु-१७१६/प्र.क्र.२३९/नापु-३१, दि.६ जुलै, २०१७ अन्वये रास्तभाव /शिधावाटप दुकाने व केरोसीन परवाने मंजूर करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्यातील तरतूदी विचारात घेऊनच, आतापर्यंत रद्द झालेल्या रास्तभाव /शिधावाटप दुकाने व केरोसीन परवाने यांचा आढावा घेऊन तसेच ज्या गावात/ क्षेत्रात नवीन रास्तभाव दुकाने व किरकोळ केरोसीन परवाना मंजूर करणे आवश्यक आहे, त्याबाबत कार्यवाही परिच्छेद १ मध्ये नमूद कालबध्द कार्यक्रमानुसार तातडीने करावी. तसेच यापुढे दरवर्षी सदर कालबध्द कार्यक्रमानुसारच नवीन रास्तभाव /शिधावाटप दुकाने व केरोसीन परवाने मंजूर करावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०८०११८२२२७३६०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Dinkar Pathak

Digitally signed by Mahesh Dinkar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9535c95dc1a6714290a6a1e084b3bb4cc266f737f88ea4b79e3f83c4a7ca12d, cn=Mahesh Dinkar Pathak
Date: 2017.08.01 18:25:10 +05'30'

**(महेश पाठक )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी.

**प्रत,**

१. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
५. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा,मुंबई.
८. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
९. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१०. सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
११. निवडनस्ती नापु-३१.